**माहे ऑक्टोबर,२०१९ वे माहे नोव्हेंबर,२०१९ मध्ये देय होणारे वेतन / निवृत्तीवेतन दिवाळीपूर्वी करणेबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

**वित्त विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण २०१९/प्र.क्र.१५३/कोषा-प्रशा५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीखः १५ ऑक्टोबर, २०१९

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक: डिडिओ-१००५/ प्र.क्र.५/कोषा प्र.५, दि.२९.०८.२००५
२) शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.६१/कोषा प्रशा-५,दि.२०.१०.२०१६

**शासन परिपत्रक :**

दिवाळी सणाची सुरुवात यावर्षी दि. २५ ऑक्टोबर, २०१९ पासून होत आहे. राज्य शासकीय अधिकारी, कर्मचारी तसेच निवृत्तीवेतन धारक यांना दिवाळी सण साजरा करता यावा याकरीता माहे ऑक्टोबर, २०१९ चे माहे नोव्हेंबर, २०१९ मध्ये देय होणारे वेतन /निवृत्तीवेतन दि.२५ ऑक्टोबर, २०१९ पूर्वी प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. उपरोक्त संदर्भीय क्र. १ मधील परिच्छेद १(८) मधील तरतूद शिथील करुन असे कळविण्यात येते की, माहे ऑक्टोबर, २०१९ या महिन्याचे वेतन, भत्त्याचे आणि निवृत्तीवेतनाचे प्रदान दि.२५ ऑक्टोबर, २०१९ पूर्वी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. कोषागारांतील कर्मचाऱ्यांच्या सेवा मोठया प्रमाणात निवडणूक कामासाठी अधिग्रहित करण्यात आल्याची वस्तुस्थिती विचारात घेता उपलब्ध मनुष्यबळाचा पर्याप्त वापर करुन वेतन / निवृत्तीवेतन देयके दि. २५ ऑक्टोबर, २०१९ पूर्वी पारित करण्याचा प्रयत्न करण्यात यावा.

४. याद्दष्टीने मुंबई वित्तीय नियम , १९५९ मधील नियम ७१ च्या तरतुदी तसेच महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ च्या खंड १ मधील नियम क्र. ३२८ मधील तरतुदी शिथिल करण्यात येत आहेत.

५. सदर तरतूदी जिल्हा परिषद, मान्यताप्राप्त व अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्था, कृषि विद्यापीठे/कृषि विद्यापीठे व त्यांच्या संलग्न अशासकीय महाविद्यालयांचे अधिकारी/कर्मचारी, तसेच निवृतवेतनधारक / कुटुंबनिवृत्तीवेतनधारक यांना देखील लागू होतील.

६. संचालक, संचालनालय, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी अधिदान व लेखा कार्यालय तसेच राज्यातील सर्व कोषागारे व उपकोषागारे यांना आवश्यक त्या सूचना तात्काळ निर्गमित कराव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१०१५१६४३५२६००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI,
serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2019.10.15 16:45:08 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
३. राज्यपालांचे सचिव.
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर ४४४००१
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२. सर्व विभागीय आयुक्त
२३. सर्व जिल्हाधिकारी
२४. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५. संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई

२६. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई

२७. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती

२८. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई

२९. संचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती

३०. वित्त विभागातील सर्व कार्यासने

३१. निवड नस्ती कोषा प्र.५